**सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकीय सेवा, (गट-अ) या पदावर सरळसेवेने नियुक्तीबाबत - श्री. माघाडे दिलीप किसन**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- नियुक्ती-२०१८/प्र.क्र.२०८/१८/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ -:** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.चापअ-१०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दि.२६/०८/२०१४
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५ (२)/(१२५-ब)/१८२३१/सात-अ, दि. २२/०९/२०१६
३) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१७/प्र.क्र.११४/कार्या-१२, दि.१५/०६/२०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकीय सेवा (गट-अ) या पदावर नियुक्तीसाठी श्री. माघाडे दिलीप किसन यांची शिफारस केली आहे. त्याअनुषंगाने नियुक्तीविषयक कार्यवाहीदरम्यान श्री. माघाडे यांनी सादर केलेल्या साक्षांकन नमुन्यातील तपशीलानुसार त्यांचा चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल संबंधित पोलिस यंत्रणेकडून प्राप्त करण्यात आला असता त्यांचेविरुद्ध मा. न्यायालयात प्रकरण प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले. ही बाब विचारात घेता, श्री. माघाडे यांना उक्त पदावर नियुक्ती देण्याबाबतच्या निर्णयार्थ त्यांचे प्रकरण संदर्भाधीन क्र. १ अन्वये गठीत करण्यात आलेल्या अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग यांच्या अध्यक्षतेखालील समितीसमोर सादर करण्यात आले. सदर समितीने श्री. माघाडे यांना सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकीय सेवा, (गट-अ) या पदावर नियुक्ती देण्यात यावी, असा निर्णय घेतला आहे. त्याअनुषंगाने श्री. माघाडे यांना नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये श्री. माघाडे दिलीप किसन यांची सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकीय सेवा, (गट-अ) या पदासाठी शिफारस केली आहे. त्यानुसार आता या शासन निर्णयाद्वारे त्यांची सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या नियुक्तीच्या ठिकाणी ते ज्या दिनांकांपासून सदर पदाचा पदभार स्वीकृत करतील, त्या दिनांकांपासून दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. सदर उमेदवाराची नियुक्ती, सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या.१२, दि. २८ एप्रिल, २०१५ नुसार विहित करण्यात आलेल्या “महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने / पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम - २०१५” व संदर्भीय क्र. ३ येथील सुधारणा नियमानुसार करण्यात येत आहे.

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | आयोगाची शिफारस | नियमानुसार वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| ०१ | श्री. माघाडे दिलीप किसन | अ.जा. | अ.जा.-१ (अनुशेषाच्या आरक्षित पदाकरीता) | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय ,चंद्रपूर |

* (**श्री. माघाडे यांचा गुणवत्ताक्रम उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. उवतंशि/तांशि-१/३३/१३/११७/२०१३, दि. ०७/०७/२०१६ अन्वये सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण या पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या श्री. अकोजवार सुधीर गंगाधरराव यांच्या नंतर व श्री. माळवटकर गजानन माधवराव यांच्या आधी राहील.**)

२. वरील प्रमाणे करण्यात आलेली नियुक्ती ही दोन वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. ३७,४०० - ६७,०००/- या पे बँड मध्ये व उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२, दि. २०/०८/२०१० मध्ये नमूद एजीपी नुसार राहील.

२) उपरोक्त नमूद उमेदवाराने सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी रुजू व्हावे अन्यथा एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. उमेदवाराने त्याचा रुजू अहवाल संबंधित संस्था प्रमुखांकडे सादर करावा.

३) वरील उमेदवाराने हिंदी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा सदर भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्याची वेतनवाढ प्रचलित नियमानुसार रोखून ठेवण्यात येईल.

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८.०८.२००९ मधील तरतूदीनुसार दि. ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. ०१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर कार्यरत अर्ज केला असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२ जानेवारी, २००७ मधील (i)(iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८.०८.२००९ च्या परिपत्रकात (i)(iv) येथील नमूद सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

५) सदर उमेदवाराचे परिविक्षाधीन कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

६) संबंधित प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, यांनी वरील उमेदवाराचा परिविक्षाधीन कालावधी समाप्तीबाबतचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/ प्र.क्र.३०२/ आठ, दि. २९/०२/२०१६ मधील नमूद केलेल्या तरतुदीनुसार विहीत कालावधीत संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास पाठवावा.

सदर उमेदवारास पहिली वेतनवाढ परिविक्षाधीन कालावधीतील एक वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर देण्यात यावी व दुसरी वेतनवाढ परिविक्षाधीन कालावधी समाप्त झाल्याचे आदेश निर्गमित करण्यात आल्यानंतर देण्यात यावी.

७) उपरोक्त उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार निश्चित करण्यात यावे.

८) सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. उमेदवारांनी सादर केलेली प्रमाणपत्रे नियुक्तीनंतर खोटी अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

९) सदर उमेदवाराचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१०) उमेदवारास सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असेल, त्यास शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि. ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनाला किमान एक महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इ. कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीशीचे बंधन शासनावर असणार नाही.

११) वरील उमेदवाराचे वैद्यकीय तपासणी अहवाल व चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत. त्याबाबतची नोंद संबंधितांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

१२) वरील उमेदवारास अनुज्ञेय वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील. उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवास भत्ता देण्यात येणार नाही.

१३) विशिष्ट ठिकाणी पदस्थापना / बदली / नियुक्ती मिळविण्यासाठी खासदार / आमदार /लोकप्रतिनिधी / खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचेमार्फत दडपण अथवा दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित उमेदवारांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२७१६०९४३१००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2018.09.27 16:15:07 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

श्री. माघाडे दिलीप किसन, अनिता रेसिडन्सी, फ्लॅट नं. ००६, स.नं.२९/१/३/१, बी-२, कात्रज-कोंढवा रोड, गोकुळनगर, इंडियन ऑइल पेट्रोल पंपासमोर, कात्रज, पुणे-४११ ०४६ (नोंदणीकृत देय डाकेने)

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई

५) सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

६) प्राचार्य ,शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन ते पात्र असल्याची संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

८) जिल्हा कोषागार आधिकारी, चंद्रपूर.

९) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१०) निवड नस्ती / तांशि-१.